**घर बांधणी अग्रिम**

**वित्तीय संस्थांकडून घर बांधणीच्या प्रयोजनासाठी घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्याकरिता सेवेची अट व सुधारित वेतनश्रेणी विचारात घेणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
**शासन निर्णय, क्रमांक : घबांअ - १००० / प्र.क्र. ८३ / २००१ / विनियम**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, **दिनांक ११ मार्च, २००२**

<u>वाचावे</u> :- शासन निर्णय, वित्त विभाग, घबांअ-१०८८/(१५५)/विनियम, दिनांक ६ नोव्हेंबर, १९९०

***<u>निर्णय</u>***

घर बांधणी अग्रिम नियम-१९६२ (मुंबई वित्तीय नियम-१९५९, नियम १३४, परिशिष्ट-२६) मधील घर बांधणी अग्रिम विषयक नियमांमधील तरतूदींच्या अधिन राहून शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ८ जुलै, १९९९ अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना पाचव्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार सुधारित वेतनश्रेणीतील मूळ वेतन विचारात घेऊन वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्याकरिता घर बांधणी अग्रिम मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने सदर शासन निर्णयातील स्तभांखाली अनुक्रमांक (इ) हा नव्याने समावेश करण्यात येत आहेत.

| प्रयोजन | घर बांधणी अग्रिमाच्या रकमेची कमालमर्यादा |
|---|---|
| **इ) घर बांधणीसाठी कर्ज देण्याकरिता ज्यांना प्राधिकृत करण्यात आलेले आहे अशा हौसिंग डेव्हलपमेंट फायनान्स कार्पोरेशन (H.D.F.C.) , राष्ट्रीयकृत बँका / सहकारी बँका, महाराष्ट्र स्टेट हौसिंग फायनान्स कार्पोरेशन व तत्सम शासनमान्य वित्तीय संस्थांकडून घर बांधणीच्या प्रयोजनासाठी घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यासाठी पाचव्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार सुधारित वेतनश्रेणीच्या मूळ वेतनाच्या अनुषंगाने अनुज्ञेय घर बांधणी अग्रिम.** | **कर्मचाऱ्याने वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जाची रक्कम वजा अग्रिम मंजूर करण्याच्या तारखेपर्यंत कर्मचाऱ्याने संस्थेला परतफेड केलेली रक्कम किंवा अग्रिम मंजूर करण्याच्या तारखेला वित्तीय संस्थेला परतफेड करण्यासाठी बाकी राहिलेली रक्कम किंवा मूळ वेतनाच्या ५० पट किंवा रु.७,५०,०००/- किंवा घराची किंमत किंवा अग्रिम परतफेडीची क्षमता यापैकी जी रक्कम कमी असेल त्या रकमेएवढा अग्रिम परतफेडीच्या प्रयोजनासाठी मंजूर करता येईल.** |

२. तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक - घबांअ-१०८८/(१५५)/विनियम, दिनांक ६ नोव्हेंबर, १९९० मधील महत्वाच्या अटींची पूर्तता मधील अनुक्रमांक (५) मध्ये खालीलप्रमाणे अंशतः बदल करण्यात येत आहे.

**" तयार घर घेण्यासाठी वित्तीय संस्थांकडून घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीसाठी ज्यांना घर बांधणी अग्रिम द्यावयाचा असेल अशा कर्मचाऱ्यांची शासनाच्या सेवेतील भरती संबंधित पदाच्या सेवाभरती नियमानुसार करण्यात आलेली पाहिजे आणि अशाप्रकारे करण्यात आलेल्या नियुक्तीनंतरची अखंड सेवा कमीत कमी आता १० वर्ष ऐवजी " ५ (पाच) वर्ष पूर्ण " अशी राहील."**

३. मुंबई वित्तीय नियम-१९५९ च्या परिशिष्ट -२६ मधील घर बांधणी अग्रिम विषयक नियमांमध्ये औपचारिक सुधारणा यथावकाश करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अं.ज.खानविलकर
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग

**प्रति**

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
५. राज्यपालांचे सचिव
६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव
१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई
* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* १६. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई
१७. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई
* १८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
* १९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* २०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई
* २१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१
२२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई /पुणे /नागपूर /औरंगाबाद / नाशिक /अमरावती
२३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद /नाशिक / अमरावती
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२५. सर्व उप कोषागार अधिकारी
२६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
२७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग ( कार्यासन -हाऊसिंग सेल ,१९ - सी ) मंत्रालय, मुंबई:३२
२८. सर्व विभागीय आयुक्त
२९. सर्व जिल्हाधिकारी
३०. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३१. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
३२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१
३३. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली - ११०००१
३४. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३५. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग
* पत्राद्वारे.

—x—x—

H-1109 (12,515-03-02)1a.